प्रस्तावास

येरवडा मध्यवर्ती कारागृह,पुणे येथील उत्पादित केलेल्या कणीक मशीन्ससाठी पेटंट मिळविण्याकरिता लागणारी फी अदा केल्याच्या कार्योत्तर मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमएजे-०१९८/७(५५)/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:-१०ऑगस्ट, २०००.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-एफसीटी/पेटंट/९८-९९/कक्ष-६ , दिनांक ४.७.९८ व १६.५.२०००.

**शासन निर्णय:-**

येरवडा मध्यवर्ती कारागृह,पुणे येथील उत्पादित केलेल्या कणीक मशीन्ससाठी (४० नग) ती इतरत्र बनविण्यांत येऊ नयेत, यासाठी इंडियन पेटंट ॲक्ट अन्वये त्यास संरक्षण मिळणे आवश्यक असल्यामुळे पेटंट मिळविण्यासाठी पेटंटबाबतची पुण्यातील सल्लागर संस्था "भाटे ॲन्ड पोंक्षे" यांची मदत व सल्ला घेण्यांत आला. सदर प्रकरणी "भाटे ॲन्ड पोंक्षे" यांना त्यांच्या दरपत्रकानुसार रु.२०,०००/- (रुपये वीस हजार फक्त) एवढी रक्कम मंजूर अनुदानातून अदा करण्यांत आली व सदरहू खर्चास कार्योत्तर मंजूरी देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांक-एफएनआर-१०६६/१२१९/२६६०/रोमन सात, दिनांक १६.२.१९६६ मधील परिच्छेद (३) मधील सूचनांनुसार सदर प्रस्तावाची सविस्तर माहिती पुढीलप्रमाणे आहे :-

१. प्रधान शीर्ष :- "२०५६ तुरुंग
१०२ तुरुंग निर्मित वस्तू" (२०५६०१२४)
०५ कार्यालयीन खर्च

२. खर्चाचा कालावधी :- सन १९९८-९९

३. खर्चाचे स्वरुप :-कारागृह निर्मित आटा मळणी मशीनचे पेटंट करण्याकरिता मे.भाटे ॲन्ड पोंक्षे पेटंट अटर्नी,पुणे यांचेमार्फत दि.कंट्रोलर ऑफ पेटंट ,मुंबई याचेकडून पेटंट ॲक्ट १९७० नुसार पेटंट परवानगी मिळणेसाठी केलेल्या करारानुसार पेटंटचा दर रु.२०,०००/- होता. सदर रक्कम ३ हप्त्यांत द्यावयाची होती. त्यानुसार मे.भाटे ॲन्ड पोंक्षे यांना आतापर्यंत रु.१५,०००/- अदा करण्यांत आले आहेत.

४. मंजुरीची रक्कम :- रु.२०,०००/- परंतु अदा रक्कम रु.१५,०००/-

५. कोणत्या परिस्थितीत शासनाची पूर्वपरवानगी घेण्यांत आली नाही? :- सदर मशीनचे कारागृहांमध्ये संशोधन करुन निर्मिती करण्यांत आली होती. याच कालावधीत मशीन इतर संस्थेस पुरवठा करण्याचे काम चालू होते. अशा परिस्थितीत पुरवठा केलेल्या मशीनप्रमाणेच इतरत्र मशीन उत्पादन करण्याची शक्यता होती व अशी मशीन इतरत्र उत्पादन होऊन व मशीनला नाव देऊन उत्पादन झाले असते. त्यामुळे यास पेटंट घेणे अत्यंत गरजेचे असल्यामुळे शासनाची पूर्वपरवानगी घेण्यांत आलेली नाही. तथापि प्रत्यक्ष अपर मुख्य सचिव यांचेशी दि.३.६.९८ रोजी चर्चा झाली व पेटंट करण्यास मान्यता दिली आहे.

६. लोकहितार्थ घेतलेला निर्णय योग्य होता काय? :- बंद्यांची सुधारणा व त्यांचे पुनर्वसन करणे हे शासनाचे धोरण असल्याने बंद्यांना सतत काम देणे आवश्यक असून सदर मशीनला पेटंट मिळाल्याने त्यांना सतत काम देणे शक्य होईल. त्यामुळे सदरचा निर्णय घेणे अत्यंत गरजेचे होते.

७. कार्योत्तर मंजुरीबाबत तात्काळ कार्यवाही करण्यांत आली काय? :- होय.

२. येरवडा मध्यवर्ती कारागृह,पुणे येथील उत्पादित केलेल्या कणीक मशीन्ससाठी (४० नग) ती इतरत्र बनविण्यांत येऊ नयेत, यासाठी इंडियन पेटंट ॲक्ट अन्वये त्यास संरक्षण मिळणे आवश्यक असल्यामुळे पेटंट मिळविण्यासाठी पेटंट बाबतची पुण्यातील सल्लागार संस्था "भाटे ॲण्ड पोंक्षे" यांची मदत व सल्ला घेण्यांत आल्यामुळे सदर प्रकरणी "भाटे ॲण्ड पोंक्षे" यांना त्यांच्या दरपत्रकानुसार रु.२०,०००/-(रुपये वीस हजार फक्त) एवढी रक्कम अदा करण्याबाबत झालेल्या खर्चास शासन या आदेशांद्वारे कार्योत्तर मंजुरी देत आहे.

३. यावर होणारा खर्च " २०५६-तुरुंग-१०२-तुरुंग निर्मित वस्तू(२०५६०१२४) ०५-कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो सन २०००-२००१च्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-५६१/२०००/व्यय-८, दिनांक ७.७.२००० अन्वये देण्यांत आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यांत येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.म.माने )
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

प्रति,
कारागृह महानिरीक्षक , कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र(लेखा परिक्षा),महाराष्ट्र,मुंबई
कोषागार अधिकारी,पुणे.
वित्त विभाग (व्यय-८कार्यासन) मंत्रालय,मुंबई.
बीयुडी-१,कार्यासन,गृह विभाग.
निवडनस्ती.